प्रवेश नियामक प्राधिकरणाच्या कक्षेतून तंत्रशिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील विविध पदविका अभ्यासक्रमाचे प्रवेश वगळणेबाबत ...

# महाराष्ट्र शासन

## उच्च व तंत्र शिक्षण विभाग

## शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१५/प्र.क्र.२५२/तांशि-४,

शिबीर कार्यालय, दालन क्र.५, हैदराबाद हाऊस,
सिव्हिल लाईन्स, नागपूर - ४४० ००१
दिनांक :- ०५ जुलै, २०१८.

वाचा :-

१) शासन निर्णय, उ.व तं.शि.वि. क्र.टिईएम-२०१६/प्र.क्र.५०१/तांशि-४, दि.१३ ऑक्टोबर, २०१६
२) शासन निर्णय, उ. व तं.शि. वि. क्र.टिईएम-२०१६/प्र.क्र.५५९/तांशि-४, दि.१५ एप्रिल, २०१७
३) शासन निर्णय, उ. व तं.शि. वि. क्र.टिईएम-२०१६/प्र.क्र.५५९/तांशि-४, दि.२७ एप्रिल, २०१७
४) शासन निर्णय, उ. व तं. शि. वि. क्र.टिईएम-२०१६/प्र.क्र.५५९/तांशि-४, दि.२१ जून, २०१७
५) शासन निर्णय, उ.व तं.शि.वि. क्र.टिईएम-२०१६/प्र.क्र.५५९/तांशि-४, दि.११ ऑगस्ट, २०१७
६) शासन निर्णय, उ.व तं.शि.वि. क्र.टिईएम-२०१६/प्र.क्र.५५९/तांशि-४, दि.१३ सप्टेंबर, २०१७
७) शासननिर्णय, उ.वतं.शि.वि.क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.३३२/तांशि-४, दि.७ ऑक्टोबर, २०१७
८) शासन निर्णय, उ.व तं.शि.वि. क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.४६५/तांशि-४, दि.१४ फेब्रुवारी, २०१८
९) शासन निर्णय, उ.व तं.शि.वि.क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.४०७/तांशि-४, दि. २२ फेब्रुवारी, २०१८
१०) शासन निर्णय, उ. व तं. शि. वि. क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.३३२/तांशि-४, दि. १ मार्च, २०१८
११) शासन निर्णय, उ. व तं. शि. वि. क्र.टीईएम-२०१८/प्र.क्र.३५/तांशि-४, दि. ३१ मार्च, २०१८
१२) शासन अधिसूचना,उ. व तं. शि. वि. क्र.टीईएम-२०१८/प्र.क्र.२७/तांशि-४, दि.१९ मे, २०१८
१३) प्रवेश नियामक प्राधिकरणाने प्रसिध्द केलेली सूचना क्र.सीईटीसेल/पदविकाप्रवेशसूचना/पॉलि.२०१८, डीएसडी २०१८ व पोस्ट एच.एस.सी २०१८/८४८,८४९ व ८५०, दि.१९ जून, २०१८
१४) शासन निर्णय, उ. व तं. शि. वि. क्र.संकीर्ण-२०१८/प्र.क्र.१८५/तांशि-४, दि. १८ जून, २०१८
१५) राज्य मंत्रिमंडळाने बुधवार दि.२७ जून, २०१८ च्या बैठकीत दिलेले निर्देश
१६) संचालक, तंत्रशिक्षण यांचे पत्र क्र.१०/एनजीपी/पदविका प्रवेश/२०१८/६५६,दि.२८ जून, २०१८
१७) शासन अधिसूचना क्र .संकीर्ण-२०१५/ प्र.क्र.२५२/तांशि-४, दि. ०५ जुलै, २०१८

प्रस्तावना :-

महाराष्ट्र विनाअनुदानित व्यावसायिक संस्था (प्रवेश व शुल्क यांचे विनिमयन) अधिनियम २०१५ (२०१५ चा महा.२८) दि.१७ ऑगस्ट, २०१५ पासून लागू करण्यात आलेला आहे. या अधिनियमातील कलम २ (द) अन्वये “व्यावसायिक शिक्षण” याचा अर्थ, शासनाने वेळोवेळी व्यावसायिक शिक्षण म्हणून घोषित व अधिसूचित केलेला कोणताही शैक्षणिक पाठ्यक्रम, असा असून त्यामध्ये, कोणत्याही नावाने संबोधला जाणारा व समुचित प्राधिकरणाने मान्यता दिलेला, पदवीपूर्व किंवा पदव्युत्तर पदवी, पदविका देणारा पाठ्यक्रम यांचा समावेश होतो; असे प्रयोजन करण्यात आलेले आहे. सदर अधिनियमातील

तरतूदीव्दारे घोषित व्यावसायिक अभ्यासक्रमांचे प्रवेश, प्रवेश नियामक प्राधिकरण अंतर्गत असलेल्या राज्य सामाईक प्रवेश परीक्षा कक्ष यांचेव्दारे करण्यात येतात. या अधिनियमातील कलम २ (द) मधील तरतूदीनुसार संदर्भ क्र.१२ येथील दि.१९मे, २०१८च्या शासन अधिसूचनेन्वये उच्च व तंत्रशिक्षण विभागाच्या अधिपत्याखालील विविध अभ्यासक्रम व्यावसायिक अभ्यासक्रम म्हणून घोषित केले आहेत. या अधिसूचनेसोबतच्या अनुसूची क (Schedule A)मध्ये व्यावसायिक पदविका पाठ्यक्रमांपैकी अनुक्रमांक १ येथील 'अभियांत्रिकी व तंत्रज्ञान पदविका', अनुक्रमांक २ येथील 'औषधनिर्माणशास्त्र पदविका' व अनुक्रमांक ३ येथील 'हॉटेल व्यवस्थापन व खाद्यपेय व्यवस्था तंत्रज्ञान पदविका' अभ्यासक्रमांचा समावेश करण्यात आलेला आहे. तथापि, सदर अधिनियमाच्या कलम ४ (क) मधील तरतूदीनुसार सदर अभ्यासक्रमांच्या प्रवेशासाठी हे अभ्यासक्रम सामाईक प्रवेश परीक्षा (CET) मधून वगळण्यात आले आहेत. आतापर्यंत या अभ्यासक्रमाची प्रवेश प्रक्रीया प्रवेश नियामक प्राधिकरणामार्फत केंद्रीभूत प्रवेश प्रक्रीयेव्दारे करण्यात येत होती. शैक्षणिक वर्ष २०१७-१८ पर्यंत तंत्रशिक्षण संचालनालयाअंतर्गत असलेल्या या पदविका अभ्यासक्रमांच्या प्रवेशासाठी जात वैधता प्रमाणपत्र अनिवार्य नव्हते. शैक्षणिक वर्ष २०१८-१९ करीता प्रवेश नियामक प्राधिकरणाने सर्व व्यावसायिक अभ्यासक्रमांच्या प्रवेशासाठी प्रवेश अर्ज करतांना जात वैधता प्रमाणपत्र असणे अनिवार्य केलेले आहे. शैक्षणिक वर्ष २०१८-१९ मध्ये पदविका अभ्यासक्रमासाठी अंदाजे ६० हजार विद्यार्थी राखीव प्रवर्गातून प्रवेश घेण्याची शक्यता आहे. पदविका अभ्यासक्रमाच्या प्रवेशासाठी इयत्ता १० वी उत्तीर्ण मागास प्रवर्गातील विद्यार्थ्यांना जात वैधता प्रमाणपत्र मिळविण्यासाठी जात वैधता पडताळणी समितीकडे अर्ज करण्यासंबंधीची सोय उपलब्ध नसल्याने पदविका अभ्यासक्रमाच्या प्रवेशासाठी राखीव प्रवर्गातील जागाकरीता अर्ज सादर करताना अडचणी निर्माण झाल्या आहेत. यास्तव, उपरोक्त नमूद जात वैधता प्रमाणपत्र मिळण्यासंबंधीचे अडचणी व मागास प्रवर्गातील विद्यार्थ्यांचे शैक्षणिक हित विचारात घेता, मंत्रिमंडळाने बुधवार दि. २७ जून, २०१८ च्या बैठकीत, पदविका अभ्यासक्रम प्रवेश नियामक प्राधिकरणाच्या कक्षेतून वगळण्या संदर्भात उचित कार्यवाही करावी, असे निर्देश दिले आहेत. या निर्देशानुसार तातडीने उपाययोजना करणे आवश्यक होते.

**<u>शासन निर्णय :-</u>**

महाराष्ट्र विनाअनुदानित व्यावसायिक संस्था (प्रवेश व शुल्क यांचे विनिमयन) अधिनियम २०१५ च्या कलम २ (द) सह कलम ३ (१) व (२) नुसार दि.१९ मे, २०१८ रोजी अधिसूचित करण्यात आलेल्या अधिसूचनेसोबतच्या अनुसूची क (Schedule A) मधील व्यावसायिक पदविका पाठ्यक्रमांपैकी अनुक्रमांक १ येथील 'अभियांत्रिकी व तंत्रज्ञान पदविका' अनुक्रमांक २ येथील 'औषधनिर्माणशास्त्र पदविका'व अनुक्रमांक ३ येथील 'हॉटेल व्यवस्थापन व खाद्यपेय व्यवस्था तंत्रज्ञान पदविका'हे तीन व्यावसायिक अभ्यासक्रम संदर्भ क्र.१७ येथील दि.०५ जुलै, २०१८ च्या अधिसूचनेव्दारे वगळण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

२. ही अधिसूचना प्रसिध्द झाल्यामुळे तंत्रशिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील विविध पदविका स्तरावरील अभ्यासक्रमाची प्रवेश प्रक्रीया प्रवेश नियामक प्राधिकरणाच्या कक्षेतून

अधिसूचनेच्या दिनांकापासून वगळली जाणार असल्याने प्रवेश नियामक प्राधिकरणाने शैक्षणिक वर्ष २०१८-१९ करिता पदविका अभ्यासक्रमाची सुरु केलेली प्रवेश प्रक्रीया आता संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्यामार्फत पुढे चालू ठेवण्यात यावी. या पदविका प्रवेश परीक्षांचे नियंत्रण करण्याची जबाबदारी संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांची राहील. या पदविका अभ्यासक्रमाचे प्रवेश करण्यासाठी, प्रवेश नियामक प्राधिकरणाच्या कक्षेत जाण्यापूर्वी तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत या पदविका अभ्यासक्रमाच्या प्रवेशासाठी जी कार्यपध्दती उपयोगात आणण्यात येत होती सर्वसाधारणपणे तशीच कार्यपध्दती शैक्षणिक वर्ष २०१८-१९ करिता व त्यापुढे अवलंबविण्याची कार्यवाही तंत्रशिक्षण संचालनालयाने करावी.

३. याबाबत पुढे स्पष्ट करण्यात येते की, उच्च व तंत्रशिक्षण विभागामार्फत तसेच इतर विभागामार्फत सुरु असलेल्या विविध व्यावसायिक अभ्यासक्रमांसाठी, "राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजना" व "डॉ. पंजाबराव देशमुख वसतिगृह निर्वाह भत्ता योजना" लागू करण्यात आलेली आहे. जरी संदर्भ क्र.१७ येथील दि. ०५ जुलै, २०१८ च्या अधिसूचनेव्दारे, घोषित करण्यात आलेल्या व्यावसायिक अभ्यासक्रमाच्या विविध अभ्यासक्रमांमधून तंत्रशिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील विविध पदविका अभ्यासक्रम वगळण्यात आले असले तरी "राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजना" व "डॉ. पंजाबराव देशमुख वसतिगृह निर्वाह भत्ता योजना" या दोन योजनांकरिता हे अभ्यासक्रम "व्यावसायिक अभ्यासक्रम" म्हणून कार्यरत राहतील आणि त्याकरिता या दोन्ही योजनांचे लाभ विहीत अटी व शर्तीची पूर्तता करणाऱ्या पदविका स्तरावरील पात्र विद्यार्थ्यांना अनुज्ञेय राहतील.त्याचप्रमाणे संदर्भ क्र.१७ येथील दि. ०५ जुलै, २०१८ च्या अधिसूचनेमुळे या पदविका अभ्यासक्रमाकरिता या व अन्य विभागांमार्फत राबविण्यात येणाऱ्या शिष्यवृत्ती, विद्यावेतन अथवा अन्य कोणत्याही योजनांचा लाभ यापुढेही अनुज्ञेय राहील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१८०७०५१५०६४१६२०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay A. Dharurkar

Digitally signed by Sanjay A. Dharurkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=637145fd393d6d5c713e94e6da7bc6bee23011448b7fc64d138630b9c76ae7a2, cn=Sanjay A. Dharurkar
Date: 2018.07.05 17:12:38 +05'30'

**( संजय औ. धारुरकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२. मा.मुख्य मंत्र्यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग , मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (कृषि), कृषि व प.दु.म. विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

६. सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सचिव (प.दु.म.), कृषि व प.दु.म. विभाग, मंत्रालय, मुंबई
८. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
९. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई
११. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा, विधानभवन, मुंबई
१२. सर्व सन्मानीय विधानपरिषद व विधानसभा सदस्य
१३. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१४. आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक
१५. आयुक्त, राज्य सामाईक प्रवेश परीक्षा कक्ष, न्यू एक्सेलसिअर बिल्डींग, फोर्ट, मुंबई-४००००१
१६. सचिव, प्रवेश नियामक प्राधिकरण, न्यू एक्सेलसिअर बिल्डींग, फोर्ट, मुंबई-४००००१
१७. सचिव, शुल्क नियामक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, ३०५, शासकीय तंत्रनिकेतन इमारत, ४९, खेरवाडी, अलियावर जंग मार्ग,वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१
१८. संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१९. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२०. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२१. आयुक्त, कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे
२२. आयुक्त, दुग्ध व्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२३. आयुक्त, मत्स्य व्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२४. संचालक, पशु संवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
२५. कुलसचिव, सर्व विद्यापीठे
२६. कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे, ता.माणगांव, जि.रायगड
२७. कुलसचिव,महाराष्ट्र राज्य आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक
२८. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण परीक्षा मंडळ, शासकीय तंत्रनिकेतन इमारत,४९,खेरवाडी, अलियावर जंग मार्ग,वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१
२९. सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालये (सर्व), (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
३०. सहसंचालक, उच्च शिक्षण, विभागीय कार्यालये (सर्व)
३१. महासंचालक,माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई (प्रसिध्दीसाठी)
३२. सर्व जिल्हाधिकारी
३३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र - १/२, मुंबई/नागपूर
३४. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र - १/२, मुंबई/नागपूर
३५. सर्व संबंधित मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक
३६. उप सचिव (मशि/विशि/अर्थसंकल्प), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
३७. अवर सचिव (तांशि-३, विशि-३), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
३८. कक्ष अधिकारी (मशि-२/मशि-४/तांशि-५/तांशि-६/साशि-१), उ. व तं. वि., मंत्रालय, मुंबई
३९. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
४०. सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहायक
४१. निवडनस्ती/तांशि-४.